पणन हंगाम २०२१-२२ मध्ये किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान/ भरडधान्य खरेदीबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन शुद्धिपत्र क्रमांकः खरेदी -२६२१/प्र.क्र.१३८ भाग - २/ना.पु.२९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २२ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

१. शासन शुद्धिपत्र क्रमांकः खरेदी - २६२१/प्र.क्र.१३८/ ना.पु.२९ दिनांक ३० सप्टेंबर, २०२१

प्रस्तावना:-

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयामध्ये धान विक्री करण्याकरिता विशिष्ट गाव एका विशिष्ट खरेदी केंद्रास धान खरेदी करण्याकरिता जोडण्याबाबत सूचना निर्गमित करण्यात आलेल्या होत्या. तथापि, शेतकऱ्यांना विशिष्ट धान खरेदी केंद्रावर धान विक्री करण्याची अट शेतकऱ्यांना धान विक्री करण्याकरिता जाचक होत असल्याने सदर अट शिथील करण्याबाबत लोकप्रतिनिधींकडून शासनाकडे वारंवार मागणी होत आहे. त्यानुसार वाचा येथील शासन निर्णयामधील खालीलप्रमाणे बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक :-**

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयामध्ये , परिच्छेद क्र. ७.१ ऐवजी खालीलप्रमाणे समाविष्ट करण्यात येत आहे.

**७.१** प्रत्येक गाव एका विशिष्ट खरेदी केंद्रास जोडण्यात यावे. खरेदी केंद्रे व प्रत्येक खरेदी केंद्रास जोडण्यात आलेल्या गावांची नावे यासंबंधी पुरेशी प्रसिध्दी देण्याबाबत जिल्हाधिकारी आणि खरेदी अभिकर्ता संस्थांनी दक्षता घ्यावी.

खरेदी केंद्रांना जोडलेल्या गावांचे क्षेत्र व गावनिहाय शेतकऱ्यांची यादी तलाठ्याकडून प्राप्त करुन घेऊन त्याची नोंद खरेदी केंद्रावरील रजिस्टरमध्ये करावी. एकापेक्षा जास्त गावे एकाच खरेदी केंद्रास जोडली गेली असल्यास अश्या केंद्रावर गावनिहाय स्वतंत्र रजिस्टर ठेवावे. सदर रजिस्टर जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांना खरेदी केंद्र तपासणीच्यावेळी उपलब्ध करुन द्यावे.

तालुका हद्दीमध्ये कोणत्याही गावातील शेतकरी त्याच्या इच्छेनुसार तालुक्यातील कोणत्याही खरेदी केंद्रावर धान विक्री करु शकतो. त्यानुसार धान खरेदी केंद्रावर धान विक्रीसाठी नोंदणी झालेल्या शेतकऱ्यांची गावनिहाय नोंद खरेदी केंद्रावरील रजिस्टरमध्ये करावी. सदर रजिस्टर जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांना खरेदी केंद्र तपासणीच्यावेळी उपलब्ध करुन द्यावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०२१११२२१८०९१०३६०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Deodatta Tungar

Digitally signed by Sudhir Deodatta Tungar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b555e4e3006da7480655b52484794686f18de73c0aa909267b188c86a755c75, pseudonym=5E1F07FF6933630D1833271F4B68D3392A0A1127, serialNumber=204E151470E2D21694C51F66F9B5A8FAAE544D15F6BFA4851335010591835680, cn=Sudhir Deodatta Tungar
Date: 2021.11.22 18:11:38 +05'30'

**( सुधीर तुंगार )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, कनमुर हाऊस, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.,नाशिक.
३) जिल्हाधिकारी, सर्व.
४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा मुंबई.
५) जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व
६) सहायक जिल्हा पुरवठा अधिकारी,सर्व.
७) सर व्यवस्थापक (महाराष्ट्र) ,भारतीय अन्न महामंडळ, बोरीवली (पूर्व), मुंबई-४०००६६
८) उपआयुक्त (पुरवठा), सर्व विभाग.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधान परिषद
२) सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य.
३) अपर मुख्य सचिव, (पणन), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती),
७) खाजगी सचिव, मा.मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण), मंत्रालय, मुंबई-३२.
८) मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची कार्यालये, (प्रत्येकी ५ प्रती),
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)
१०) व्यवस्थापकीय संचालक, दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन, मुंबई
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक.